सा.बां.वि. अहमदनगर, कोल्हापूर, जालना, नंदुरबार, नांदेड, यवतमाळ, चंद्रपूर, अमरावती व नागपूर

**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ सांस्कृतिक सभागृह बांधणेस प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याबाबत. (सन २०२४-२५)**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकास-२०१८/प्र.क्र.२५३/यो-६**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक: २६ ऑगस्ट, २०२४

वाचा:-

१) शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि.क्र. झेडपीए-२०१५/प्र.क्र-१०/वित्त-९, दि.२५/०३/२०१५.
२) शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि.क्र.विकास-२०१५/प्र.क्र.५२/यो-६, दि.२७/०३/२०१५
३) शासन पत्र क्र. विकास-२०१८/प्र.क्र.२५३/यो-६, दि.१५/०२/२०२३ रोजीचे बैठकीचे इतिवृत्त
४) शासन पत्र क्र. विकास-२०१८/प्र.क्र. २५३/ यो-६, दि.२४.०५.२०२३

**प्रस्तावना:-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात “लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या गावांतर्गत मुलभूत सुविधा (लेखाशीर्ष २५१५ १२३८)” या योजनेंतर्गत जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात रु.१०००.०० कोटी इतकी पूरक मागणी मंजूर करण्यात आली होती. त्यापैंकी रु.४०.०० कोटी इतका निधी पुण्यश्लोक श्रीमती अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ सांस्कृतिक सभागृह बांधकामासाठी राखून ठेवण्यात आला होता. त्यानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात एकूण ६१ सभागृहांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

२. या प्रकरणी संदर्भ क्र.३ अन्वये मा.मंत्री, ग्रामविकास यांच्या अध्यक्षतेखाली दि.१८/०१/२०२३ रोजी झालेल्या बैठकीत ६१ पैकी १७ ठिकाणी कामे सुरू न झाल्याने ती वगळण्याचा निर्णय घेण्यात आला. तसेच ५० नवीन ठिकाणी पुण्यश्लोक श्रीमती अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ सांस्कृतिक सभागृह बांधकामासाठी रितसर प्रस्ताव शासनास सादर करावा, असे मा.मंत्री, ग्रामविकास महोदयांनी निदेश दिले होते. त्यानुसार संदर्भ क्र.४ नुसार विविध जिल्ह्यातील ५० नवीन ठिकाणी सभागृह बांधकाम करण्यास मान्यता दिली आहे. यापैकी **अहमदनगर जिल्ह्यातील १, कोल्हापूर जिल्ह्यातील २, जालना जिल्ह्यातील १, नंदुरबार जिल्ह्यातील १, नांदेड जिल्ह्यातील ४, यवतमाळ जिल्ह्यातील १, चंद्रपूर जिल्ह्यातील ३, अमरावती जिल्ह्यातील १ व नागपूर जिल्ह्यातील १ अशा एकूण १५** गावांच्या ठिकाणी (रू.१००.०० लक्ष च्या मर्यादेत) पुण्यश्लोक श्रीमती

अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ सांस्कृतिक सभागृह बांधकामासाठी **एकूण रु.१५००.०० लक्ष** इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

अहमदनगर जिल्ह्यातील १, कोल्हापूर जिल्ह्यातील २, जालना जिल्ह्यातील १, नंदुरबार जिल्ह्यातील १, नांदेड जिल्ह्यातील ४, यवतमाळ जिल्ह्यातील १, चंद्रपूर जिल्ह्यातील ३, अमरावती जिल्ह्यातील १ व नागपूर जिल्ह्यातील १ अशा एकूण १५ गावांमध्ये पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या नावाने सांस्कृतिक सभागृह बांधण्यास येणारा एकूण खर्च रू.१५,००,००,०००/-(रूपये पंधरा कोटी फक्त-) एवढ्या खर्चास खालील अटीं व शर्ती च्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून सदर कामांना प्रशासकीय मान्यतेच्या रक्कमेच्या प्रथम टप्प्यात २०% इतका निधी म्हणजेच रु.३००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ बांधकाम करावयाच्या सांस्कृतिक सभागृहांचे परिशिष्ट-अ सोबत जोडले आहे.

अ) काम सुरु करणेपूर्वी जागेची खात्री करावी.

ब) काम सुरु करण्यापूर्वी, सदर अंदाजपत्रक संबंधित मंडळाचे सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिक्षक अभियंता व उपभोक्त्या विभागाचे सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.

क) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास शासकीय वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

ड) उपरोक्त वास्तुसंबंधी अथवा कोणत्याही तांत्रिक मुद्द्यासंबंधातील कोणत्याही बाबीमध्ये शंका/अडचण उद्भवल्यास ग्रामविकास विभागास व सा.बां. विभागास विनाविलंब संपर्क साधावा.

२. यासाठी मंजूर रक्कम सभागृहाच्या संबंधित कामाकरिता खर्च करण्यासाठी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडे सुपूर्द करण्यात यावी. तसेच **ज्या कामासाठी अनुदान मंजूर झाले आहे त्याच कामावर खर्च करणे बंधनकारक राहील**.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या सर्व कामांसाठी प्रचलित कार्यपध्दतीनुसार प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी, निविदा काढणे/स्वीकरणे इत्यादी बाबतची कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्याकडून करुन घेण्याची जबाबदारी **संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ** यांची राहील. तसेच सदरील कामे मंजूर अनुदानाच्या मर्यादेतच पूर्ण होतील, याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्चाच्या कामांना प्रशासकीय मान्यता दिल्यास, त्यासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही. अन्यथा, ती संबंधित कार्यालयाची जबाबदारी राहील.

४. सदरील कामे हाती घेण्यापूर्वी संबंधित क्षेत्रात जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतीच्या सार्वत्रिक निवडणूका / पोट निवडणूकांसाठी आचारसंहिता अंमलात नाही, याबाबत संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी खात्री करावी.

५. सर्व कामांच्या पूर्णत्वाचे दाखले व उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी महालेखापाल, संबंधित विभागीय आयुक्त व शासनास पाठवावेत.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी वित्तीय वर्षा अखेरीस खर्च झाला नाही तर अखर्चित निधी शासन कोषागारात जमा करुन चलनाची प्रत महालेखापाल मुंबई व शासनास पाठविण्यात यावी.

७. वरील बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. एल-३ मुख्य लेखाशिर्ष-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम-८००-इतर खर्च (०१) (०८) ग्रामीण भागातील विकास कामासाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (योजनांतर्गत) दत्तमत (२५१५-१२३८), २७ लहान बांधकामे (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या चालू वित्तीय वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, ज्ञापन वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१/०४/२०२४ व व क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ अन्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२६१२५४२३२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.08.26 13:28:34 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय,मुंबई.
३) मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
५) महालेखापाल, लेखा व परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.

६) अप्पर मुख्य सचिव , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

७) अप्पर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

८) अप्पर मुख्य सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९) प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-०१.

१०) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छ. संभाजीनगर

११) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर, कोल्हापूर, छ.संभाजीनगर, धुळे, नांदेड, यवतमाळ, चंद्रपूर, अमरावती व नागपूर

१२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर, कोल्हापूर, जालना, नंदुरबार, नांदेड, यवतमाळ, चंद्रपूर, अमरावती व नागपूर

१३) निवड नस्ती (का. यो-६), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**(शासन निर्णय क्रमांकः विकास-२०१८/प्र.क्र.२५३/यो-६, दि.२६ ऑगस्ट, २०२४ सोबतचे परिशिष्ट-अ)**

*****पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सांस्कृतिक सभागृहासाठी दिलेली प्रशासकीय मान्यता रक्कम व वितरीत निधी तपशील *****

**परिशिष्ट-अ**

**जिल्हा:- अहमदनगर, कोल्हापूर, जालना, नंदुरबार, नांदेड, यवतमाळ, चंद्रपूर, अमरावती व नागपूर**

| अ.क्र. | गावाचे नाव | तालुका | जिल्हा | प्र.मा. रक्कम (रु.लक्ष) | २०% प्रमाणे वितरीत रक्कम (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| १ | आस्तेगाव | राहता | अहमदनगर | १००.०० | रु.२०.०० |
| २ | अदमापूर | भुदगढ (गारगोटी) | कोल्हापूर | १००.०० | रु.२०.०० |
| ३ | वाशी | करवीर | कोल्हापूर | १००.०० | रु.२०.०० |
| ४ | आनंदगाव | परतूर | जालना | १००.०० | रु.२०.०० |
| ५ | म्हसावद | शहादा | नंदुरबार | १००.०० | रु.२०.०० |
| ६ | माळेगाव | लोहा | नांदेड | १००.०० | रु.२०.०० |
| ७ | रीसनगाव | लोहा | नांदेड | १००.०० | रु.२०.०० |
| ८ | वझरगा | देगलूर | नांदेड | १००.०० | रु.२०.०० |
| ९ | नरसी | नायगाव | नांदेड | १००.०० | रु.२०.०० |
| १० | धनगरवाडी | दारव्हा | यवतमाळ | १००.०० | रु.२०.०० |
| ११ | खेडी | सावली | चंद्रपूर | १००.०० | रु.२०.०० |
| १२ | बेम्बाळ | मूल | चंद्रपूर | १००.०० | रु.२०.०० |
| १३ | भंगाराम तळोधी | गोंडपिंपरी | चंद्रपूर | १००.०० | रु.२०.०० |
| १४ | वाठोडा शुक्लेश्वर | भातकुली | अमरावती | १००.०० | रु.२०.०० |
| १५ | बेला | उमरेड | नागपूर | १००.०० | रु.२०.०० |
| **एकूण** | | | | **रु.१५००.००** | **रु.३००.००** |